पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य यांच्या अधिनस्त
पोलीस अधिक्षक अकोला यांच्या कार्यक्षेत्रातील
" सिव्हील लाईन" पोलीस ठाण्याचे विभाजन करुन
" खदान " नवीन पोलीस ठाणे निर्माण करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. पीओएस-२२०९/३५/प्र.क्र.४४/पोल-३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक १ जुन, २००९

वाचाः- १) अपर पोलीस महासंचालक (नि.व.स.), पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक-पोमसं/२६ अ/४७/अकोला (सिव्हील लाईन)/६७/०२ दिनांक १०.२.२००९

**प्रस्तावनाः-**

अकोला शहरातील वाढती लोकसंख्या व नवीन वसाहती यामुळे गुन्हयामध्ये झालेली लक्षणिय वाढ ही बाब विचारात घेता कायदा व सुव्यवस्था राखण्यासाठी व गुन्हेगारीवर नियंत्रण ठेवण्यासाठी सध्याच्या" सिव्हील लाईन " पोलीस ठाण्याचे विभाजन करुन "खदान" पोलीस ठाणे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णयः-**

वरील प्रस्तावाचा सर्वांगिण विचार करुन पोलीस अधिक्षक, अकोला यांचे कार्यक्षेत्रातील " सिव्हील लाईन " पोलीस ठाण्याचे विभाजन करुन पोलीस अधिक्षक, अकोला यांचे आस्थापनेवरील उपलब्ध मनुष्यबळातुन " खदान " पोलीस ठाणे निर्माण करण्यास व यासाठी आवश्यक असलेले मनुष्यबळ पोलीस दलासाठी निर्माण करण्यात येत असलेल्या पदनिर्मितीच्या चौथ्या व पाचव्या टप्यामध्ये प्रस्तावित करुन निर्माण करण्यास या निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संगणक सांकेतांक २००९०६११२३६३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

प्र.मो.वानखडे

(प्र.मो. वानखडे)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
विशेष पोलीस महानिरीक्षक, अमरावती परिक्षेत्र अमरावती.
पोलीस आयुक्त, अमरावती.
पोलीस अधिक्षक, अकोला.
प्रधान महालेखाकार (लेखा परिक्षण-१) महाराष्ट्र राज्य मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला.
निवड नस्ती (पोल-३)

D:\Bhoite २००९\June २००९G.R. for Khadan Police Thane १.६.०९.lwp